**शासकीय गोदाम दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**
**मौ.राजापूर,ता.राजापूर,जि.रत्नागिरी**
**(सन २०१८-१९)**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदादु-१११४/प्र.क्र.८१९/नापु-१६-ब**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.
तारीख: २४ ऑक्टोबर, २०१८.

**प्रस्तावना-**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील शिधापत्रिका धारकांना जीवनावश्यक वस्तूंचे वितरण करण्यात येते. भारतीय अन्न महामंडळाकडून प्राप्त होणाऱ्या अन्नधान्याची साठवणूक राज्य शासनाच्या गोदामामध्ये केली जाते. मौजे राजापूर, ता.राजापूर, जि.रत्नागिरी येथील शासकीय गोदाम दुरूस्तीचे अंदाजपत्रक जिल्हा पुरवठा अधिकारी, रत्नागिरी यांच्याकडून शासनास प्राप्त झाले आहे. सदर अंदाजपत्रकाची छाननी करुन त्यास प्रशासकीय मंजुरी देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे. त्यानुसार मौजे राजापूर, ता.राजापूर, जि.रत्नागिरी येथील शासकीय गोदाम दुरूस्तीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

२. मौजे राजापूर, ता.राजापूर, जि.रत्नागिरी येथील शासकीय गोदाम दुरूस्तीच्या कामास व अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीनतेने प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

I. सदर अंदाजपत्रक उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, राजापूर यांनी तयार केले असून कार्यकारी अभियंता, उत्तर रत्नागिरी सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी यांनी साक्षांकित केले आहे. उपभोक्ता विभागाच्या वतीने जिल्हा पुरवठा अधिकारी, रत्नागिरी यांनी साक्षांकन केले आहे.

II. सदर अंदाजपत्रकामध्ये इमारत दुरुस्तीसह विमा (१%) , आकस्मिक खर्च (४%), विद्युतीकरण (११% ) इ.साठी तरतूद करण्यात आली आहे.

III. दुरूस्तीस विलंब किंवा इतर कारणांनी गोदाम दुरूस्तीस वाढीव खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

IV. अंदाजपत्रकातील दुरुस्ती कामाच्या आवश्यकतेबाबत जिल्हा पुरवठा अधिकारी, रत्नागिरी यांनी प्रथमत: खात्री करावी व तद्नंतरच काम हाती घ्यावे.

३. गोदाम दुरुस्ती कामाची यादी खालीलप्रमाणे-

| अ. क्र | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे सर्वसाधारण स्वरुप | अंदाजित खर्च (रु.) | सा.बां.विभाग मंत्रालय यांच्याकडील छाननीअंती खर्च (रु) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | रत्नागिरी | राजापूर | राजापूर | खराब झालेले पत्रे बदलणे, जुन्या पत्र्यांना पेंटिग करणे,खिडक्या बदलणे,<br>गोदामास रंगरंगोटी करणे, भिंतींना गिलावा करणे, जांभ्या दगडाची संरक्षक भिंत बांधणे, बांधीव गटाराची तरतूद करणे,शौचालय बांधणे,तुटलेल्या फरश्या बदलणे, ॲल्युमिनियम पार्टिशियनचे केबिन बनविणे, इमारतीस विदयुत जोडणी करणे इ.(अंदाजपत्रकानुसार) | ३१,२४,८३६ | ३२,८६,४६५/- |
| **एकूण** | | | | | | **३२,८६,४६५/-** |
| **अक्षरी रुपये बत्तीस लाख शहाऐंशी हजार चारशे पासष्ट फक्त** | | | | | | |

४. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या शासकीय गोदाम दुरूस्तीकरीता निधी उपलब्ध झाल्यांनतर त्याप्रमाणे दुरूस्तीची कामे करण्यात यावी.

५. निधी प्राप्त झाल्यानंतर शासकीय गोदाम दुरूस्तीची कामे तातडीने सुरू करण्यात येऊन पूर्ण करण्यात यावीत. गोदाम दुरूस्ती सुरू झाल्यांनतर प्रथम दुरूस्तीचा संपूर्ण तपशिल तसेच संबंधित दुरूस्तीचा दरमहा आढावा घेऊन दुरूस्तीची प्रगती जिल्हा पुरवठा अधिकारी, रत्नागिरी यांनी शासनास सादर करावी.

६ सदरील गोदाम दुरूस्तीची कामे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावीत. त्याकरीता आवश्यक निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येईल.

७. सदर जिल्हयातील वर नमूद गोदाम दुरूस्तीच्या कामास या अगोदर प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली नाही याची खातरजमा जिल्हा पुरवठा अधिकारी, रत्नागिरी यांनी करावी.

८. सदरील शासकीय गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी.

९. प्रशासकीय मान्यतेच्या आदेशात कामाचे संक्षिप्त स्वरूप नमूद करण्यात आलेले असून प्रत्यक्षात गोदाम दुरूस्तीची कामे शासनास सादर केलेल्या दुरूस्ती कामांच्या अंदाजपत्रकानुसारच पूर्ण करण्यात यावीत. म्हणजेच शासनास सादर केलेल्या अंदाजपत्रकात समाविष्ट बाबीनुसार गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण करण्यात यावीत.

१०. गोदाम दुरुस्तीच्या कामातील अनावश्यक पुनरुक्ती टाळण्याच्या दृष्टीने सदरहू आदेशात नमूद गोदाम दुरुस्तीच्या कामाच्या आवश्यकतेबाबत जिल्हा पुरवठा अधिकाऱ्यांनी व्यक्तिशः छाननी करावी. गोदाम दुरुस्तीच्या कामातील पुनरुक्ती अथवा विसंगतीबाबत शासनास अवगत करावे. यासंदर्भात पुढील शासन आदेशापर्यंत कार्यवाही स्थगित करावी.

११. सदरील कामावरील खर्च सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात व तद्नंतर वेळोवेळी उपलब्ध अनुदानातुन करण्यात येईल. सदर गोदामाच्या दुरूस्तीवरील खर्च "मागणी क्रमांक एम-०२, लेखाशिर्ष २४०८ अन्न साठवण व वखार साठवण यावरील भांडवली खर्च , ०१, अन्न १०१, प्रापण व पुरवठा (०३), प्रापण वितरण व किंमत वितरण ०३, ०२ ( मुफसल ) २४०८ ०१०८ २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

१२. सदर गोदामाच्या दुरूस्तीचे काम पूर्ण झाल्यानंतर सदरचे काम हे मंजूर अंदाजपत्रकाप्रमाणे उत्कृष्ट झाल्याबाबतची खातरजमा संबंधीत कार्यकारी अंभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी संयुक्तरित्या करून तसा स्थल निरिक्षण अहवाल तयार करावा व तो अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

१३. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग पहिला उपविभाग-५ मधील अनुक्रमांक १० नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४३/इमा-२, दि.३१.०३.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२४१६१०४६८९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2018.10.24 16:16:11 +05'30'

**( स.श्री. सुपे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उपायुक्त (पुरवठा), कोकण विभाग.
२. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
३. जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
४. जिल्हा पुरवठा अधिकारी, रत्नागिरी.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षण), मुंबई/ नागपूर.
८. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
९. निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)
१०. वित्त विभाग (व्यय-४, अर्थोपाय व अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई.
११. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
११. सहाय्यक संचालक (संगणक), लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.
१२. निवड नस्ती/नापु-१६ब